NO.47/A:13 gr

भडगांव दुय्यम कारागृह जिल्हा जळगांव
यांची आहार खर्चाची बीले अदा
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र.एमआयएस ०१२०/१५/११५/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२, दिनांक : १९ मार्च, २००३.

वाचा:- १) जिल्हादंडाधिकारी यांचे पत्र क्र.दंडप्र /२/कावि/१२७२/२०००,दि.१.१.२००३ तसेच कारागृह उपमहानिरीक्षक(मुख्यालय)पुणे यांचे पत्र क्र.रेशन/दुकान/ १०९०/२०००/१४५८/कक्ष,३, दिनांक ३.२.२००३.

**शासन निर्णय**:-जिल्हादंडाधिकारी, जळगांव यांनी त्यांच्या दिनांक १.१.२००३ च्या पत्रान्वये भडगांव दुय्यम कारागृह जळगांव यांच्या कारागृहातील आरोपींच्या आहारभत्ताविषयक दि.१.१.९० ते दि.३१.१२.९०,१.१.९१ ते दि.३१.१२.९१ व दि.१.१.९२ ते दि.३१.१२.९२ या कालावधीतील रु. ४१,३७०/- इतक्या रक्कमांच्या देयकाची अदायगी प्रलंबित असून सदर देयके १ वर्षावरील कालावधीची असल्याने त्यास मंजूरी देण्याबाबत विनंती केलेली होती. सदर देयके उशीराने सादर केल्याने त्यास विलंब झाल्याचे कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे यांच्या दिनांक ३.२.२००३ च्या पत्रावरून दिसून येते. हया बाबी विचारात घेता जिल्हादंडाधिकारी जळगांव यांनी भडगांव दुय्यम कारागृह जळगांव यांच्या कारागृहातील आरोपींच्या आहारभत्ताविषयक दि.१.१.९० ते दि.३१.१२.९२ या कालावधीतील रु. ४१,३७०/- ( रुपये एकेचाळीस हजार तीनशे सत्तर फक्त) इतकया रक्कमेच्या प्रलंबित देयकांची अदायगी करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र- १००९/ प्र.क्र.४६/ २००१, दि.११.७.२००१ मधील अनुक्रमांक-६ नियम क्र.४० मधील तरतुदीनुसार सदर देयके कोषागारास सादर करण्यात आली नव्हती व त्याचे प्रदान करण्यात आले नव्हते त्याची खात्री करावी सदर रक्कमेचा खर्च मुख्यलेखा शिर्ष २०५६-तुरुंग (००) (०३) इतर तुरुंग (२०५६-००५३) या लेखाशिर्षांतर्गत सन २००२-२००३ च्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

/SM

२. हा शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम दि.११.७.२००१ अन्वये प्रशासकीय विभागाकडे असणाऱ्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( र. ना. माळी )

कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक मुख्यालय,पुणे/कारागृह उपमहानिरीक्षक पश्चिम विभाग,पुणे

जिल्हादंडाधिकारी, जळगांव

तहसीलदार तथा अधिक्षक, भडगांव दुय्यम कारागृह जि.जळगांव

महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परीक्षा )महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी,जळगांव.

निवडनस्ती ( पीआरएस-२)